खर्चामध्ये काटकसर
गरज आणि महत्त्व.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक बीजीटी–2599/प्र.क्र.15/99/अर्थसंकल्प–19,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 20 फेब्रुवारी 1999.

**पहा :–** शासन परिपत्रक क्रमांक बीजीटी–2598/प्र.क्र.28/अर्थसंकल्प–19, दिनांक 17 ऑक्टोबर 1998.

**शासन निर्णय :–** योजनांतर्गत व विशेषतः योजनेतर खर्चामध्ये आवश्यक प्रमाणात काटकसर करण्याच्या हेतूने शासनाने विविध काटकसरीच्या योजना वेळोवेळी अंमलात आणल्या आहेत. या उपाययोजना चालू वित्तीय वर्षात पुढे चालू ठेवण्याबाबत संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर काटकसरीच्या उपाययोजना तसेच या शासन निर्णयाच्या परिच्छेद 2 मध्ये दर्शविलेल्या उपाययोजनेची अंमलबजावणी पुढील आदेशापर्यन्त चालू ठेवण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

2\. (1) सचिवांपेक्षा कमी दर्जाच्या अधिका–यांना विमान प्रवास अनुज्ञेय असणार नाही. अत्यावश्यक प्रकरणी संबंधित विभागाचे मंत्री/सचिव यांच्या पूर्वपरवानगीनेच इतर अधिका–यांनी विमान प्रवास अनुज्ञेय असल्यास, इकॉनॉमी क्लासने विमान प्रवास करावा. प्रधान सचिव व त्यावरील वरिष्ठ अधिकारी यांनाच फक्त उच्च दर्जाने (एक्झीक्युटिव्ह क्लास) विमान प्रवास अनुज्ञेय राहील. या सूचना शासनाच्या अधिपत्याखालील तसेच स्वायत्त मंडळे, महामंडळे, सार्वजनिक उपक्रम यातील त्या त्या दर्जाच्या अधिकारी व कर्मचारी यांनाही लागू राहतील.

(2) प्रवासाच्या ठिकाणापासून जाण्याच्या ठिकाणापर्यन्त रेल्वे सुविधा उपलब्ध असल्यास, अत्यंत तातडीच्या प्रकरणी वरिष्ठ अधिका–यांच्या पूर्वपरवानगीशिवाय, शासकीय वाहनाचा वापर करू नये. तसेच अधिका–यांनी त्यांच्या कार्यक्षेत्राबाहेर दौ–यावर जाताना अत्यंत निकड असल्याशिवाय शासकीय वाहनाचा वापर करू नये. रेल्वे किंवा बसने अनुज्ञेय असलेल्या वर्गानेच प्रवास करावा.

(3) अत्यावश्यक प्रवास दौरे सोडून, अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रवास दौ–यास मान्यता देण्यात येऊ नये.

(4) संबंधित खात्याचे मा. मंत्री महोदय/सचिव व विभागीय पातळीवर विभागीय आयुक्तांच्या परवानगी–शिवाय क्षेत्रीय अधिका–यांना मुंबईला किंवा विभागीय मुख्यालयास बोलाविण्यात येऊ नये. तसेच क्षेत्रीय अधिका–यांनी विभागीय मुख्यालय/मुंबईला स्वतःहून दौ–यावर येऊ नये.

(5) अधिका–यांनी समक्ष दौ–यावर जाण्याऐवजी कामासाठी ज्या ज्या ठिकाणी दूरध्वनी/टेलिकॉन्फरन्सी/व्हिडीओ कॉन्फरन्सी या सेवा उपलब्ध असल्यास त्यांचा कटाक्षाने वापर करावा.

(6) फॅक्स, इ–मेल सुविधा उपलब्ध असल्यास पत्र, विवरणपत्रे पाठविताना त्यांचा जास्तीत जास्त वापर करण्यात यावा. माहिती पाठविताना सदर सुविधांचा वापर करताना अपेक्षित खर्चाचा सापेक्षपाने विचार करूनच माहिती पाठविण्यासाठी खास दूत पाठविण्याचा निर्णय घ्यावा. शक्यतो करून खास दूतासाठी मासिक रेल्वे पास घेण्यात यावा.

(7) दूरध्वनी वापराबाबत दिनांक 31 ऑक्टोबर 1998 रोजी सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयातील सर्व सूचनांचे काटेकोर पालन करावे. सदरहू शासन निर्णयानुसार सह सचिव व त्यावरील सर्व पदांकरिता कार्यालयीन व निवासी दूरध्वनीवर एस.टी.डी. सुविधा उपलब्ध राहील. मात्र अशी सवलत प्रत्येक विभागात सह सचिव दर्जाचे जास्तीत जास्त दोन अधिका–यांनाच अनुज्ञेय राहील. ही सवलत कोणत्या अधिका–यांना द्यावी याचा निर्णय संबंधित विभागाच्या सचिवांनी घ्यावा.

(कृ.मा.प.

दोनपेक्षा अधिक अधिका-यांकडे एस.टी.डी. सुविधा असल्यास त्या सुविधा तत्काळ रद्द करण्यात याव्यात.

(8) शासकीय अधिकारी/कर्मचारी यांनी महामंडळाच्या खर्चाने प्रवास दौरे करू नयेत.

(9) मंत्रालय व अन्य शासकीय कार्यालये असलेल्या इमारतींचे नूतनीकरण, सुशोभिकरण करण्यात येऊ नये. तसेच संगणक प्रणाली बसविण्यासाठी नवीन सजावट, फर्निचर इत्यादी घेण्यात येऊ नये.

3. मंत्रालयीन विभागांना असे सूचित करण्यात येते की, वित्त विभागाने वेळोवेळी प्रदान केलेल्या वित्तीय शक्तींचा वापर करताना काटकसरविषयक आदेशांचे सुध्दा अनुपालन योग्य प्रकारे केले जाईल, याबाबत दक्षता घ्यावी.

4. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी आपल्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सार्वजनिक क्षेत्रातील सर्व उपक्रम, मंडळे, महामंडळे व इतर स्वायत्त संस्था यांना त्या त्या संस्थांमध्ये अशा प्रकारची उपाययोजना करण्यासंबंधीचे आदेश तत्काळ देण्यात यावेत व त्या आदेशांची एक प्रत वित्त विभागास पृष्ठांकित करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

पि. सुब्रह्मण्यम
मुख्य सचिव.

प्रति

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्र्यांचे व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयीन विभागांचे सर्व प्रधान सचिव/सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
महालेखापाल-1 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-1 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख.

---

* पत्राने.

एच-1290(13,000+10-2-99)अ.